एतदर्थ मंडळाची मराठी भाषा परीक्षा-
महाराष्ट्र लघुउद्योग विकास महामंडळ मर्यादित
यांच्या कार्यालयातील अधिकारी/
कर्मचाऱ्यांना परीक्षेस बसण्यास परवानगी देण्या
बाबत.

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
निर्णय क्रमांक:-मभाप-१०८४/२७७०/तीस,
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
दिनांक :- २७ फेब्रुवारी, १९८५.

निर्णय :- एतदर्थ मंडळामार्फत घेण्यात येणाऱ्या मराठी अधिकाऱ्यांच्या व कर्मचाऱ्यां-
च्या मराठी भाषा परीक्षेला महाराष्ट्र लघु-उद्योग विकास महामंडळ [मर्यादित],
मुंबई यांच्या अधिकाऱ्यांना व कर्मचाऱ्यांना बसण्यास परवानगी देण्यात येत आहे.

२. या परीक्षेकरिता परीक्षा शुल्क रु. १२/-[अक्षरी रु. बारा] लागू करण्यात
येत आहे. हे शुल्क शासनाच्या "०६५ इतर प्रशासनिक सेवा [सी]इतर जमा[।।।]
किरकोळ जमा" या अर्थशीर्षाखाली भरून चलनाची पहिली प्रत परीक्षेकरिता
भराव्या लागणाऱ्या आवेदनपत्रासोबत जोडावी. तसेच हे आवेदनपत्र उमेदवारांनी
विहित मुदतीत आपल्या कार्यालयामार्फत भाषा संचालक, महाराष्ट्र राज्य यांचे कार्यालय
नवीन प्रशासन भवन, १४ वा मजला, मंत्रालयासमोर, मुंबई ४०० ०३२ यांच्याकडे पाठवावे.

३. हा शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग व वित्त विभागाच्या
संमतीने त्या. विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र. १२२/व्यय-४, दि. १७जानेवारी १९८५अनुसार काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

[क. मा. पाटील]
शासनाचे सहाय्यक सचिव.

प्रति,
महाव्यवस्थापक, [अनुश्रवण], महाराष्ट्र लघु-उद्योग विकास महामंडळ मर्यादित, रूपानिधी,
९ वालचंद हिराचंद मार्ग, बॅलार्ड इस्टेट, मुंबई ४०० ०३८.,
. भाषा संचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
महालेखापाल, महाराष्ट्र राज्य, १, मुंबई,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई,
वित्त विभाग [व्यय-४],
उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग [उ-११].
सर्व मंत्रालयीन विभाग,
निवड नस्ती [२ प्रती].